2

20140822113604252З

**प्रादेशिक पर्यटन विकास योजनेतंर्गत महाराष्ट्र पर्यटन विकास मंडळाकडून महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांना वितरीत केलेल्या निधीतून भारतवन गार्डन, मरोळ, अंधेरी येथील कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय, क्रमांक टीडीएस २००९/प्र.क्र.२८७/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांकः- २५ ऑगस्ट, २००९.

संदर्भ :- १) टीडी.एस २००७/७/प्र.क्र.२६९/ पर्यटन, दिनांक ३ मार्च, २००८
२) टीडी.एस २००८/प्र.क्र.४४२/ पर्यटन, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९
३) टीडी.एस २००९/४/प्र.क्र.१२०/ पर्यटन, दिनांक २२ जून २००९
४) टीडी.एस २००९/४/प्र.क्र.१२०/ पर्यटन, दिनांक २२ जून २००९
५) म.प.वि.म पत्र क्रमांक म.प.वि.म./बांधकाम/२००९/२३४६ दि २१.८.०९

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन अनु. १ ते ४ येथील शासन निर्णयान्वये प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत भारतवन गार्डन, मरोळ, अंधेरी सन रुपये ७३३.२० लाख इतक निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केला आहे.

महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केलेल्या रु. ७३३.२० लाख पैकी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास वितरीत केलेल्या निधीतून खालीलप्रमाणे कामे करणार असून संदर्भाधीन अनु.क्र. ५ येथील महाराष्ट्र पर्यटन विकास मंडळाच्या दि. २१.८.०९ च्या पत्रामध्ये नमूद केल्याप्रमाणे पुढे नमूद केलेल्या रु.४२३.२० लाख इतक्या रकमेच्या कामांना प्रशासकीय मान्यता व निधी खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | जिल्हयाचे नाव | | कामाचा तपशील | रक्कम |
|---|---|---|---|---|
| १. | अंधेरी | अ. | **भारतवन गार्डन, मरोळ, जि. मुंबई येथे पर्यटन सुविधा निर्माण करणे, सुशोभिकरण करणे.** | |
| | | १. | नवीन आसन व्यवस्था भिंतीचे बांधकाम | १५.०० |
| | | २. | सध्याच्या अस्तित्वात असलेल्या आसन व्यवस्था भिंतीचे बांधकाम | १५.०० |
| | | ३. | तलावाजवळील भिंतीचे बांधकाम | १५.०० |
| | | ४. | आसन व्यवस्थेच्या ठिकाणी सौंदर्यीकरण | १५.०० |
| | | ५. | दक्षिण दिशेच्या उतार भागाचे सौंदर्यीकरण भाग - २ | १५.०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | ६. | नाना - नानी बागेचे सौंदर्यीकरण | १५.०० |
| | | ७. | मातीच्या ट्रॅकचे बांधकाम | १५.०० |
| | | ८. | मार्गावरील भागाचे विद्युतीकरण | १५.०० |
| | | ९. | कारंजेच्या ठिकाणी विद्युतीकरण | १५.०० |
| | | १०. | कारंजाजवळ पेव्हड जॉगिंग ट्रॅक बनविणे | १५.०० |
| | | ११. | प्रवेशद्वाराजवळील मैदानाचे सुशोभिकरण | १५.०० |
| | | १२. | प्रवेशद्वाराजवळील मैदानालगत पेव्हड जॉगिंग ट्रॅक बनविणे | १५.०० |
| | | १३. | संगीतमय कारंजे चालविण्यासाठी सुरक्षा रक्षकांची तरतूद(तात्पुरती) | ०.४९ |
| | | १४. | २.५% आस्थापना खर्च (आकस्मिकता) | ४.५१ |
| | | | **एकूण** | **१८५.००** |
| | | **ब.** | **भारतवन गार्डन, मरोळ, जि. मुंबई येथे पर्यटन सुविधा निर्माण करणे, सुशोभिकरण करणे.** | |
| | | १. | पंपहाऊसचे बांधकाम | ६.०० |
| | | २. | नवे आणि जुने आसन व्यवस्थेसाठी पायऱ्यांचे बांधकाम | १२.४२ |
| | | ३. | बास्केटबॉल कोर्ट बांधणे | ७.०० |
| | | ४. | बैठकीसाठी अस्तित्वात असलेल्या जागेसाठी कटिंग व फिलिंग | १२.४० |
| | | ५. | संरक्षण भिंत व पाईपसह कुंपण उभारणे | १०.१६ |
| | | ६. | काटेरी तारेचे कुंपण | ११.७४ |
| | | ७. | आसन व्यवस्थेसाठी रँप बनविणे. | ६.०० |
| | | ८. | आसन व्यवस्थेचे बांधकाम भाग - १ | १४.७७ |
| | | ९. | आसन व्यवस्थेचे बांधकाम भाग - २ | १४.७७ |
| | | १०. | कारंजे आणि प्रवेशद्वाराचे विद्युतीकरण | १२.०० |
| | | ११. | कुपनलिका आणि पाणीपुरवठा लाईन | १२.०० |
| | | १२. | नियंत्रण कक्ष रुमचे बांधकाम | ४.०० |
| | | १३. | कारंज्याचे विस्तारीकरण | ११.०० |
| | | १४. | कारंज्याजवळ शौचालय आणि मुतारीचे बांधकाम | ८.५० |
| | | १५. | चेस बार्ड, सँड पिट आणि फिक्सींग खेळाचे साहित्य | १४.९८ |
| | | १६. | दक्षिण दिशेच्या उतार भागाचे सौंदर्यीकरण भाग - १ | १०.०० |
| | | १७. | दक्षिण दिशेच्या उतार भागाचे सौंदर्यीकरण भाग - ३ | १२.०० |
| | | १८. | साऊथ साईडला Wormiculture Arrangement | ८.०० |
| | | १९. | दक्षिण दिशेच्या मुख्यप्रवेशद्वारासह कंपाऊंडचे सौंदर्यीकरण | ८.०० |
| | | २०. | धबधब्याचे बांधकाम करणे. | १२.०० |
| | | २१. | पाय-यांवर पेव्हड जॉगिंग ट्रॅक बनविणे | १०.०० |
| | | २२. | पॉंडचे बांधकाम व सौंदर्यीकरण | ६.०० |
| | | २३. | रोझ गार्डनसाठी पायऱ्या बांधणे | २.२६ |
| | | २४. | २.५% आस्थापना खर्च (आकस्मिकता) | ५.६५ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | २५. | विजेचे बिल, पाण्याचे बिल तसेच संगीतमय कारंजे चालविण्याकरता लागणाऱ्या इतर कामासाठी तरतूद(तात्पुरती) | ६.५५ |
| | | | **एकूण** | **२३८.२०** |
| | | | **एकूण (अ+ब)** | **४२३.२०** |

**वर नमूद केलेली कामे करण्यास शासन खालील अटीच्या अधिन राहून मंजूरी देत आहे.**

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकाऱ्यांवर राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च मार्च २०१० पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

६) उपरोक्त सर्व कामांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता, यापूर्वी घेतली नसल्यास, काम सुरु करण्यापूर्वी प्राप्त करुन घेण्यात यावी. ज्या प्रस्तावांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता देताना काही अटी व शर्ती विहित करण्यात आलेल्या आहेत अशा अटीं व शर्तींची आधी पूर्तता करणे बंधनकारक राहील.

७) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

८) योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणा-या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१०)   सदर निधीतून होणा-या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यात महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास व शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

११)   सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर स्मारकाच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची राहील.

१२)   सदर शासन निर्णय मासिक निधी वितरण प्रणालीप्रमाणे विभागास दिलेल्या अधिकाराअंतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका- १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, अनु.क्र. १, परिच्छेद क्र. ५ अन्वये प्रशासकीय विभागाना दिलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

आ.बा.डमाळे

**(आ.बा.डमाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.
जिल्हाधिकारी, मुंबई / मुंबई उपनगरे
मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, म्हाडा, गृहनिर्माण भवन, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (का.१४१२) मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (का. व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-११) मंत्रालय, मुंबई,
कक्ष अधिकारी, सां.का.-(अर्थसं), पर्यटन व सां.का.विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.